**विद्यापीठ क्षेत्राचा विकास योजनांतर्गत**
**योजनेखाली अनुदान मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
उच्च व तंत्रशिक्षण विभाग
शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - २००९/(१५९/०९)/विशि-२
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१०.

**पहा** :- १) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.युएनआय/ २००९/योजनांतर्गत योजना/विशि/३४५६, दि. ७.९.२००९
२) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र. युएनआय/ २००९/योजनांतर्गत योजना/विशि/, दि. १३.१.२०१०

**प्रस्तावना** : महाराष्ट्रात १३ अकृषि विद्यापीठे आहेत त्यापैकी काही विद्यापीठ फार जुनी असून काही नवीन स्थापन झालेली आहेत. जुन्या विद्यापीठांकडे फार मोठया प्रमाणात जागा आहेत तर नवीन विद्यापीठांकडे आता नव्याने जागा उपलब्ध झालेल्या आहेत. अशा विद्यापीठांच्या जागेचा विकास करण्याकरिता उदा. अंतर्गत रस्ते तयार करणे, विद्युतीकरण करणे नागरिकांचे जागेवर अतिक्रमण होऊ नये म्हणून कुंपन भिंत बांधणे, परिसरामध्ये वृक्षारोपन करणे, परिसराचे सुशोभीकरण करणे इत्यादीसाठी दरवर्षी तरतूद लागत असते तथापी विद्यापीठांना अशा कामासाठी तरतूद उपलब्ध करुन देण्यात आलेली नाही.

सबब या कारणासाठी विद्यापीठांना तरतूद उपलब्ध करुन देण्याबाबत सन २००९-१० पासून विद्यापीठ क्षेत्राचा विकास या योजनेखाली तरतूद उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :- या शासन निर्णयान्वये आता एकूण रुपये ४०.०० लाख एवढया खर्चास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. या अंतर्गत विद्यापीठांमध्ये अंतर्गत रस्ते तयार करणे, विद्युतीकरण करणे नागरिकांचे जागेवर अतिक्रमण होऊ नये म्हणून कुंपन भिंत बांधणे, परिसरामध्ये वृक्षारोपन करणे, परिसराचे सुशोभीकरण करणे इत्यादी कामांसाठी खालील विद्यापीठांना त्यांच्या नावासमोर दर्शविलेला निधी सन २००९-१० या आर्थिक वर्षासाठी मंजूर करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विद्यापीठाचे नांव | मंजूर निधी |
|---|---|---|
| १ | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड | रु. ८.०० लक्ष |
| २ | संत गाडगे बाबा अमरावती विद्यापीठ अमरावती | रु. ८.०० लक्ष |
| ३ | उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ , जळगांव | रु. ८.०० लक्ष |
| ४ | सोलापूर विद्यापीठ सोलापूर | रु. ८.०० लक्ष |
| ५ | डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद | रु. ८.०० लक्ष |
| | **एकूण** | **रु. ४०.०० लक्ष** |

२. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल -२ नागपूर त्यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार

असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्व कागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी मंजुर केलेल्या अनुदानाचा वापर त्याच उद्दिष्टासाठी करावा आणि त्याबाबतचे विनियोजन प्रमाणपत्र (Utilisation Certificate)संबंधितांना योग्य वेळी सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर खर्च " मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२,सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्च शिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, - (००) (११) विद्यापीठ क्षेत्राचा विकास (२२०२ ३४६८), ३१ सहाय्यक अनुदाने " या लेखाशिर्षाखाली सन २००९-१० मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग पहिला उप विभाग तीन मधील अ.क्र. ४-नियम क्रमांक २७(२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५ मे, २००९ अन्वये प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.govt.in या संकेत स्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१००४०१०२२१३८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( अनिल तांबे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. राज्यपाल तथा कुलपती यांचे उपसचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) शिक्षण संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
३) कुलगुरु, नांदेड, अमरावती, जळगांव, सोलापूर, औरंगाबाद.
४) कुलसचिव, नांदेड, अमरावती, जळगांव, सोलापूर, औरंगाबाद.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७) सहसंचालक, उच्च शिक्षण, विभाग नांदेड, अमरावती, जळगांव, सोलापूर, औरंगाबाद.
८) जिल्हाकोषाधिकारी, पुणे.
९) नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१०) वित्त विभाग,(व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
११) सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) मा. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१३) उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
१४) अवर सचिव (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५) निवड धारिका विशि - २

My Documents\Nilima\G.R\५६९.०९.doc